महाराष्ट्र राज्य जनजाती विकास महामंडळ आणि आदिवासी सहकारी संस्थांमध्ये सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली अस्थायी पदे दि. ०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण ०१२५/प्र.क्र.२८/१८-स,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक - १०.०३.२०२५**

**<u>वाचा</u>:-**
1) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दि. ०५.०५.२०११.
2) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांचे पत्र क्र. जा.क्र. कक्ष-१/आस्था/मराजविमआससं/मुदतवाढ/२०२५/१९३, दि. २२/०१/२०२५.
3) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. मराज- ०२२४/प्र.क्र.६३/१८-स, दि. २७/०९/२०२४.
4) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. ०३.०३.२०२५

**<u>प्रस्तावना :-</u>**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी/ अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत २५ पदांचा समावेश आहे. उपरोक्त संदर्भ क्र. ३ अन्वये महाराष्ट्र राज्य जनजाती विकास महामंडळ आणि आदिवासी सहकारी संस्थांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या २५ अस्थायी पदांना दि. २८/०२/२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदत वाढ दि. २८/०२/२०२५ रोजी संपुष्टात आली असल्याने महाराष्ट्र राज्य जनजाती विकास महामंडळ आणि आदिवासी सहकारी संस्थांच्या सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजना राबविणेबाबत लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली २५ अस्थायी पदे ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम करण्यासाठी सन २०२५-२६ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत वर नमूद केलेल्या वाचा क्र. २ मधील पत्रान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या उपरोक्त वाचा क्र. २ मधील प्रस्तावानुसार महाराष्ट्र राज्य जनजाती विकास महामंडळ आणि आदिवासी सहकारी संस्थांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविणेबाबत लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली खालील २५ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ पासून दि. ३१/०८/२०२५ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदत वाढीस मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरीक्षक वर्ग- १ | एस २० : ५६१००-१७७५०० | १ |
| २ | लेखापरीक्षक श्रेणी- १ | एस १४ : ३८६००-१२२८०० | ५ |
| ३ | लेखापरीक्षक श्रेणी- २ | एस १३ : ३५४००-११२४०० | ३ |
| ४ | उपलेखापरीक्षक | एस ८ : २५५००-८११०० | ४ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | एस ६ : १९९००-६३२०० | ९ |
| ६ | शिपाई | एस १ : १५०००-४७६०० | ३ |
| | एकूण पदे | | २५ |

वरील एकूण २५ अस्थायी पदांचा होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र.व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष "२४२५- सहकार, १०१- सहकारी संस्थांचे लेखापरीक्षण, १०१- (एक) (ए) लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)" या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. परंतू ही अस्थायी पदे विहीत पध्दतीने भरली आहेत या अटीच्या अधीन राहून ही मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३.०३.२०२५ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१०११४७१८१२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAHUL CHANDRASHEKHAR SHINDE

Digitally signed by RAHUL CHANDRASHEKHAR SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=2b92cb6c4f872b298eba5b276742f5d2e72d0421076aa9ed40beedc51e27e130, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6D85E99C3671CB5DA40A5218962B08B2FAEA34CA2F0BFC7731E9E07ECA33F6DA, cn=RAHUL CHANDRASHEKHAR SHINDE
Date: 2025.03.10 11:48:02 +05'30'

**(राहूल शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
२. महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
३. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
४. वित्त विभाग (व्यय-२),/अर्थसं-१२,/अर्थसं-१९, /व्यय-१४, मंत्रालय, मुंबई.
५. कार्यासन अधिकारी, ५-स /१२-स,/१७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय. मुंबई.
६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
८. विभागीय विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (सर्व)
९. सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरिक्षण) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
१०. सह निबंधक, सहकारी संस्था (आदिवासी विकास) महाराष्ट्र राज्य ,नाशिक.
११. जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था(पुणे,ठाणे,नाशिक,धुळे,यवतमाळ,नागपूर, चंद्रपूर)
१२. विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२, (आदिवासी विकास योजना), नाशिक.

१३. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, (पुणे,ठाणे,नाशिक,धुळे,यवतमाळ,नागपूर, चंद्रपूर)
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, ((पुणे,ठाणे,नाशिक,धुळे,यवतमाळ,नागपूर, चंद्रपूर)
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७. महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
१८. निवड नस्ती.